**राज्यात महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळ स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-०३२४/प्र.क्र.५६/विशा-३(अ)**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक: १ एप्रिल, २०२५**

**वाचा:** -

विशेष पोलीस महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य सायबर,मुंबई यांचे पत्र क्र.१५३/MH-Cyber/ २०२५, दि. १०.०१.२०२५ व दि.२८.०२.२०२५

**प्रस्तावना:-**

भारत हा जागतिक स्तरावर सर्वात जास्त इंटरनेटचा वापर करणाऱ्या देशांपैकी एक आहे. सद्यस्थितीत भारतामध्ये कार्यरत मोबाईल वापरकर्त्यांची संख्या ११२ कोटी असून इंटरनेट वापर कर्त्यांची संख्या ७५ कोटी आहे. जानेवारी,२०२४ मध्ये भारतामध्ये सोशल मीडिया वापर कर्त्यांची संख्या ४६ कोटी होती, त्यामध्ये दिवसेंदिवस वाढ होत आहे.

मागील १० वर्षात आर्थिक व्यवहारांच्या स्वरूपामध्ये क्रांतीकारक बदल झाले आहेत. डिजिटल व्यवहारांची संख्या आर्थिक वर्ष २०१३-१४ मध्ये २२० कोटी होती. आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये ती १८,५९२ कोटी इतकी झाली. डिजिटल व्यवहारांमध्ये मागील १० वर्षात ८४ पट वाढ झाली. आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये ९२ कोटी यूपीआय व्यवहार होत होते. आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये यूपीआय व्यवहार १३,११६ कोटी झाले. सदर युपीआय व्यवहारामध्ये १४२ पट वाढ झाली आहे.

उपरोक्त वाढ होत असतांना डिजिटल अटक घोटाळे, क्रिप्टोकरन्सीशी संबंधित फसवणुकीसह बनावट गुंतवणूक योजना सारखे सायबर गुन्हे वाढत आहेत. सामान्य नागरिकांना फसविण्यासाठी डीपफेक तंत्रज्ञान व आर्टिफिशियल इंटेलिजेंन्स (एआय) सारख्या प्रगत तंत्रज्ञानाचा वापर केला जात आहे. तसेच, खोटे अश्लील व्हिडीओ बनवून सोशल मिडीयावर प्रसारित करण्याच्या धमक्या देणे, पोलीस / न्यायाधीश असण्याचा दावा करुन आर्थिक फसवणूक करणे यास्वरुपाच्या गुन्ह्यातही वाढ होत आहे.

सायबर क्राइम हा जगातील सर्वात मोठा सिंडिकेट गुन्हा म्हणून उदयास आला आहे. सायबर क्राईम एक प्रकारे संघटित उद्योगाचे स्वरूप प्राप्त झाले असून त्याची जागतीक स्तरावर सहा ट्रिलीयन डॉलर इतकी व्याप्ती झाली आहे. सायबर गुन्ह्यांचे सायबर दहशतवादात रूपांतर, रॅन्समवेअर हल्ले आणि डेटा उल्लंघनामुळे राष्ट्रीय सुरक्षेला गंभीर धोका निर्माण झाला आहे.

राज्य शासनाने सायबर फसवणूकीला बळी पडणाऱ्या नागरिकांना विशेषत: महिला, बालके व ज्येष्ठ नागरिकांना केंद्र स्थानी ठेवून अत्याधूनिक तंत्रज्ञान, कुशल मनुष्यबळ आणि संसाधनांनी युक्त असा महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्प सुरू केला आहे. सदर प्रकल्प राज्यातील सायबर सुरक्षा आणि सायबर गुन्हे नियंत्रणासाठी एक हा अत्याधुनिक केंद्रबिंदू ठरणार आहे. अन्य राज्याकडून तसेच परदेशातून सदर प्रकल्प त्यांच्याकडे राबविण्याबाबत मार्गदर्शन व वाणिज्यीक स्वरुपात सेवा उपलब्ध करून देण्याबाबत विचारणा होत आहे. सदर तंत्रज्ञान व संसाधनांचा वापर करून राज्याचा महसूल वाढविण्याच्या दृष्टीने गृह विभागाच्या अधिपत्याखाली महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळ (MCCSC) स्थापन करण्याचे प्रस्तावित आहे.

सदर महामंडळाच्या स्थापनेमुळे राज्यात सायबर क्षेत्रासंबधी मजबूत पायाभूत सुविधा निर्माण होऊन राज्यशासनाला त्यांच्या प्रशासकीय विभागांची व अंतिमत: नागरिकांची सायबर सुरक्षा सुनिश्चित करणे शक्य होईल. त्यानुषंगाने राज्यात महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळ स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सायबर अपराधांच्या वाढत्या धोक्याविरुद्ध एकूण सायबर सुरक्षा स्थिती आणि नागरिकांची सुरक्षा सुधारण्याकरीता तसेच, सायबर सुरक्षा आणि सुरक्षित सायबर पद्धतींबद्दल सरकारी विभाग, सार्वजनिक आणि खाजगी संस्था आणि नागरिकांना मार्गदर्शन करण्यासाठी महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळ स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे.

अ) **महामंडळाचे स्वरूप**:-

१) कंपनी कायदा, २०१३ अंतर्गत स्थापित करण्यात येणारे महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळ हे १००% राज्य सरकारच्या मालकीचे असेल.

२) प्रस्तावित महामंडळाचे मुख्यालय (नोंदणीकृत कार्यालय) महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालय, जागतीक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई येथे असेल.

३) महामंडळाचे अधिकृत भागभांडवल २०० कोटी रुपये असेल. राज्य शासन सदर महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळाला, १००% पेड-अप आणि सबस्क्राइब्ड भाग भांडवल उपलब्ध करून देईल.

४) महामंडळाला प्रथम वर्षात आवश्यक असलेला प्रशासकीय खर्च शासनामार्फत देण्यात येणाऱ्या सुरुवातीच्या भाग भांडवलातून करण्यात येईल. तद्नंतर महामंडळाला प्राप्त होणाऱ्या महसूल उत्पन्नातून आगामी प्रशासकीय खर्च भागविण्यात येईल.

५) प्रस्तावित महामंडळ व्यवसायाच्या सुरुवातीच्या टप्प्यात असल्याने कंपनी Paid-up भांडवलाचा वापर तिच्या प्रारंभिक ऑपरेशन्स आणि व्यवसाय वाढीसाठी करेल.

६) शासन निर्णय दि.०५.०१.२०१६ अन्वये स्थापन करण्यात आलेला महाराष्ट्र सायबर कक्ष हे स्वतंत्रपणे कार्यरत राहील.

## आ) महामंडळ रचना :-

महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळाच्या संचालक मंडळावर अध्यक्ष व संचालकाची रचना पुढील प्रमाणे असेल.

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, गृह विभाग | अध्यक्ष, पदसिद्ध |
| २ | अ.मु.स. वित्त विभाग / त्यांचे प्रतिनिधी | संचालक, पदसिद्ध |
| ३ | अ.मु.स. नियोजन विभाग / त्यांचे प्रतिनिधी | |
| ४ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई / त्यांचे प्रतिनिधी | |
| ५ | प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग/ त्यांचे प्रतिनिधी | |
| ६ | प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग | |
| ७ | अपर पोलीस महासंचालक/ विशेष पोलीस महानिरीक्षक/ पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र सायबर | व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी, पदसिद्ध |
| ८ | सह सचिव / उप सचिव (विशा-३(अ)), गृह विभाग | नामनिर्देशित संचालक |
| ९ | सायबर सुरक्षा तंत्रज्ञानाशी संबंधित अनुभवी तज्ञ | स्वतंत्र संचालक (शासनाकडून नामनिर्देशीत केलेले) |
| १० | सायबर सुरक्षा क्षेत्राशी संबंधित प्रतिष्ठित संस्थेतील शिक्षणतज्ञ | |
| ११ | सायबर सुरक्षा क्षेत्रातील अनुभव व कौशल्यासह सायबर कायद्याशी संबंधित तज्ञ व्यक्ती | |

महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळासाठी एकूण ९९ पदे प्रस्तावित करण्यात येत आहेत. त्याचा तपशील खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यान्वयन अधिकारी | १ |
| २ | मुख्य तांत्रिक अधिकारी | १ |
| ३ | मुख्य वित्त अधिकारी | १ |
| ४ | मुख्य माहिती सुरक्षा अधिकारी | १ |
| ५ | मुख्य कायदेशीर प्रमुख | १ |
| ६ | मुख्य मानव संसाधन अधिकारी | १ |
| ७ | चार्टर्ड अकाउंटंट | २ |
| ८ | कंपनी सचिव | १ |
| ९ | सायबर सल्लागार | ६० |
| १० | उप विभागीय प्रमुख | ५ |
| ११ | विभागीय सपोर्ट स्टाफ | १५ |
| १२ | प्रशासन कर्मचारी | १० |
| **एकूण** | | **९९** |

१) संचालक मंडळाच्या मान्यतेने महामंडळाला वेळोवेळी ऑपरेशन टीम, फायनान्स आणि अकाउंट्स Legal & Company Affairs, Human Resource, प्रशासकीय मनुष्यबळ, भविष्यातील तांत्रिक बदल लक्षात घेवून कौशल्याधारित पदे, इत्यादी सेवेच्या आवश्यकतेनुसार खुल्या बाजारातून नियमित किंवा कराराच्या आधारावर भाड्याने घेता येईल आणि त्यांचे वेतन महामंडळाद्वारे देण्यात येईल.

२) तथापि, महामंडळामार्फत वेतन व अन्य प्रशासकीय बाबींवर होणार खर्च महामंडळाच्या एकत्रित महसूलाच्या १०% पेक्षा जास्त होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात येईल.

३) अध्यक्ष संचालक मंडळाची बैठक बोलावतील. अध्यक्ष किंवा अध्यक्षांच्या अनुपस्थितीत त्यांनी प्राधिकृत केलेले पदसिद्ध संचालक (गृह) यांच्या नेतृत्वाखाली मंडळाची बैठक आयोजित करण्यात येईल. व्यवस्थापकीय संचालक सदर मंडळाचे दैनंदिन कामकाज हाताळतील. व्यवस्थापकीय संचालक यांना सदर महामंडळाच्या दैनंदिन कामकाजाबाबत खालील प्रमाणे अधिकार असतील.

   १. कोणत्याही वेळी, ३३% सदस्य ऑनलाइन किंवा ऑफलाइन उपस्थित असल्यास, अध्यक्षांच्या नेतृत्वाखाली मंडळाचा कोरम पूर्ण आणि सक्षम मानला जाईल.
   २. महामंडळाचे अधिकारी व कर्मचारी यांच्या आस्थापना विषयक बाबी, कामकाज वाटप /पूर्नवाटप तसेच अधिकारी/कर्मचारी यांना जबाबदारी पार पाडण्यासाठी आवश्यक अधिकार देणे याबाबत व्यवस्थापकीय संचालक यांना अंतिम अधिकार असतील.
   ३. महामंडळाच्या कर्जदारांकडून/ सेवा उपभोक्त्यांकडून मिळणाऱ्या कोणत्याही वसूल न होणाऱ्या रकमेची थकबाकी वसूल करणे, त्याबाबत सूचना देणे तसेच त्यातून उद्भवणाऱ्या दाव्यासंदर्भात उचित कायदेशीर कार्यवाही करणे व त्याबाबत संबंधितांना सूचना देणे. तसेच, कर्जदारांना/ पूरवठादारांना थकबाकी देणे.
   ४. महामंडळाच्या कार्यासाठी अतिरिक्त निधीची गुंतवणूक करणे आणि महामंडळाच्या व्यवसायासाठी केलेल्या गुंतवणूकी काढून घेणे.
   ५. महामंडळाच्या व्यवसायासाठी खरेदी/विक्री करणे आणि संचालक मंडळाच्या मान्यतेच्या अधीन राहून कोणत्याही पक्षाशी करार करणे, कराराच्या अटींमध्ये बदल करणे किंवा करार रद्द करणे.
   ६. कोणत्याही बँक किंवा वित्तीय किंवा कर्जदेणाऱ्या संस्थेला आवश्यक असलेली कागदपत्रे सादर करणे.
   ७. महामंडळाला आवश्यक नसलेल्या मालमत्तेची विल्हेवाट लावणे, विक्री करणे किंवा स्क्रॅप करणे.
   ८. महामंडळ जे प्रकल्प हाती घेतील ते प्रकल्प कार्यान्वीत करण्यासाठी आवश्यक स्थावर व जंगम मालमत्ता भाड्याने / कराराने/ विकत घेणे व त्यासाठी करार करणे.

९. महामंडळाच्या व्यवसाय, हितसंबंध आणि उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी महामंडळाच्या दैनंदिन कारभाराच्या संदर्भात कर्तव्ये, जबाबदाऱ्या आणि दायित्वे पार पाडणे .

१०. महामंडळातील अधिकारी/कर्मचारी यांना विशिष्ट क्षेत्रासाठी प्रशिक्षित करण्यासाठी व मंडळाच्या व्यवसाय व उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी आवश्यकतेनुसार सल्लागारांची/प्रशिक्षकांची नियुक्ती करणे.

११. सायबरसुरक्षा आणि सायबर गुन्ह्यांच्या गतिमान स्वरुपामुळे, तातडीचे निर्णयांसाठी विशेषतः सायबर धोक्यांना प्रतिसाद देण्यासाठी व्यवस्थापकिय संचालक यांना महामंडळाच्या कार्योत्तर मंजुरीच्या अधीन राहून त्वरित कार्यकारी निर्णय घेण्याचा अधिकार असेल. तसेच, व्यवस्थापकिय संचालक संबंधित अधिकाऱ्यांशी सल्लामसलत करुन, वार्षिक महत्तम ५कोटी रुपयांपर्यंतच्या खर्चास अधिकृत मान्यता देऊ शकतात. ५ कोटी रुपयांपेक्षा जास्त रकमेसाठी, संचालक मंडळाची पूर्व मंजुरी आवश्यक असेल.

१२. तसेच, संचालक मंडळाच्या मान्यतेने व्यवस्थापकीय संचालक महामंडळाच्या अन्य दैनंदिन कामकाजाबाबत रुपरेषा निश्चित करतील.

**इ) <u>महामंडळाचे कार्ये</u>:-**

१) प्रस्तावित महामंडळ राज्यातील शासकीय व निमशासकीय विभाग, खाजगी उपक्रम, भारतातील आणि परदेशातील शासकीय, सार्वजनिक आणि खाजगी उपक्रमांसाठी विविध सायबर सुरक्षा आणि त्यासंदर्भातील इतर प्रकल्प हाती घेवून त्यांना मागणीनुसार सायबर सुरक्षा/सायबर तंत्रज्ञान विषयक सल्लागार सेवा प्रदान करणे. तसेच, आवश्यकतेनुसार उपरोक्त संस्थासाठी सशुल्क प्रशिक्षणाचे आयोजन करेल व त्यानुषंगाने Special Purpose Vehicle (SPV) ची स्थापना करणे.

२) नामांकन आधारावर किंवा विनंती करणाऱ्या राज्यातील, देशातील तसेच परदेशातील शासकीय व निमशासकीय विभागांना, खाजगी उद्योग यांना सायबर सुरक्षा क्षेत्र, सायबर सुरक्षा ऑडिट व अनुपालन, फॉरेन्सिक तपासणी, जोखीम मूल्यांकन, असुरक्षितता मूल्यांकन, प्रवेश चाचणी, Security Operation Center (SOC) सेवा, सॉफ्टवेअर आणि अनुप्रयोग चाचणी (Software and application testing), आपत्ती पुनर्प्राप्ती (Disaster recovery), सायबर धमकी व्यवस्थापन व घटना प्रतिसाद, प्रशिक्षण तसेच वेळोवेळी राज्य शासनाच्या मान्यतेने अन्य सायबर सुरक्षा विषयक सल्लागार सेवा प्रदान करणे. त्यासाठी संचालक मंडळाच्या परवानगीने व त्यांनी विहीत केलेले सेवा शुल्क आकारले जाईल.

३) महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळामार्फत देण्यात येणाऱ्या तांत्रिक गरजांच्या स्वरूपावर आधारित सेवांसाठी शुल्क आकारण्यात येईल. सदर सेवा शुल्क

तत्कालीन बाजारभाव लक्षात घेऊन संचालक मंडळाच्या मान्यतेने निश्चित केले जाईल.

४) सायबर सुरक्षा आणि संबंधित उत्पादने विकसित करण्यासाठी महाराष्ट्राला सायबर सुरक्षा कंपन्या आणि स्टार्टअप्ससाठी सहाय्य देण्यासाठी व्हेंचर कॅपिटल मॉडेल विकसित करणे.

५) महाराष्ट्रातील शासकीय व निमशासकीय विभाग, क्षेत्रीय कार्यालये, सार्वजनिक उपक्रम यांनी सायबर सुरक्षाविषयक सेवा थेट महामंडळाकडून किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या पॅनेलमधील एजन्सीमार्फत घ्याव्यात. सदर महामंडळाने सायबर सुरक्षा क्षेत्रातील नामवंत एजन्सीच्या पॅनेलची नियुक्ती संचालक मंडळाच्या मान्यतेने त्यांचे स्तरावर करावी.

६) महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळ आपल्या नागरिकांमध्ये सायबर सुरक्षा जागरुकता निर्माण करण्यासाठी  कार्यशाळा, सामाजिक, इलेक्ट्रॉनिक, प्रिंट आणि डिजिटल मीडिया इत्यादीं विविध माध्यमातून राज्यव्यापी जागरूकता मोहीम सुरू करेल आणि महामंडळ बँका, मोबाइल कंपन्या आणि वित्तीय संस्थांशी समन्वय साधणे.

७) सायबर हल्ल्यांच्या परिणामांची पूर्वकल्पना देण्यासाठी,त्यावर कारवाई करण्यासाठी आणि त्यांचा परिणाम कमी करण्यासाठी संशोधन व तंत्रज्ञान विकास तसेच उपकरणे, साधने आणि तंत्र स्थापित करणे.

८) सायबर गुन्हेगार, हॅकर्स आणि इतर गुन्हेगारांवर कायद्यानुसार कारवाई करणे शक्य होण्यासाठी महाराष्ट्र सरकारच्या सायबर गुन्हे विभागाच्या कायदा अंमलबजावणी एजन्सींसह सर्व भागधारकांशी सहयोग करेल.

९) सायबर सुरक्षित व्यवसाय विकसित करण्यासाठी उद्योग, आंतरराष्ट्रीय एजन्सी आणि सरकारी संस्थांशी सहयोग करणे.

१०) डिजिटल मालमत्ता आणि व्यवसायांचे संरक्षण करण्यासाठी बौद्धिक संपदा हक्क (IPR) समस्या, ऑनलाइन पायरसी, ट्रेडमार्क उल्लंघन आणि बनावट ट्रॅकिंग इत्यादींबाबत कायदा अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणांना सहकार्य करणे.

११) सायबर सुरक्षा प्रशिक्षण आणि विकास प्रयोगशाळा या सारख्या पायाभूत सुविधांची स्थापना करण्यासाठी महामंडळ सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रांसोबत धोरणात्मक भागीदारी करेल. सायबर सुरक्षा आणि जागरूकता वाढविण्यासाठी महामंडळ व्यावसायीक सामाजिक दायित्व (CSR) तत्वावर सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रांकडून मदत घेवू शकेल.

१२) आंतरराष्ट्रीय संस्थांसोबत भागीदारी व धोरणात्मक युती करून  त्यांच्या पायाभूत सुविधा, कौशल्य, संशोधन क्षमता इत्यादींचा फायदा महामंडळास प्राप्त होईल.

१३) महामंडळ खाजगी संस्थासाठी प्रशिक्षण आणि जागरूकता कार्यशाळा आयोजित करेल आणि प्रतिष्ठित सायबर सुरक्षा प्रशिक्षण संस्था किंवा विद्यापीठांशी सशुल्क प्रशिक्षण देण्याबाबत करार करेल. तसेच, शाळा, महाविद्यालये आणि विद्यापीठे इत्यादींसाठी प्रमाणन कार्यक्रम आणि सायबरसुरक्षा अभ्यासक्रम विकसित करण्यास मदत करणे.

१४) महाराष्ट्र शासनाचे सर्व विभाग, राज्य सरकारी सार्वजनिक उपक्रम, महामंडळ, यांनी सायबर धोक्यापासून संरक्षण करण्यासाठी महामंडळाकडून व्यावसायीक सल्ला घ्यावा. याबाबतचे दर संचालक मंडळ निश्चित करतील.

१५) याव्यतिरिक्त राज्य शासन वेळोवेळी निर्देशीत करेल त्याप्रमाणे सायबर गुन्हे व सुरक्षा विषयक कार्ये करणे.

**ई) आर्थिक तरतुद :-**

१) महामंडळाचे अधिकृत भागभांडवल २०० कोटी रुपये असेल.

२) प्रतिवर्षी रू.२५ कोटी प्रमाणे भागभांडवल अंशदान म्हणून रू. २५ कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्यात येईल. त्यासाठी राज्यशासनामार्फत नवीन लेखाशीर्ष घेवून त्याबाबत तरतूद करण्यात येईल.

३) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभागाच्या २३ सप्टेंबर, २०११ रोजीच्या धोरणानुसार, विभागाला वाटप केलेल्या एकूण अर्थसंकल्पीत निधीपैकी ३% ई-गव्हर्नन्स उपक्रमांसाठी वाटप केले जातील. एखाद्या विभागाने महामंडळाकडून उपरोक्त सेवा घेतल्यास सदर ई-गव्हर्नन्स निधीमधून त्याप्रमाणात निधी महाराष्ट्र सायबर गुन्हे सुरक्षा महामंडळाकडे थेट जमा केला जाईल.

सदर शासन निर्णय हा दि.१७.०३.२०२५ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in ह्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४०११९०४२९१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAHUL VIJAY KULKARNI

Digitally signed by RAHUL VIJAY KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=31493D4A6291F531ED8FD00972CCBFA0376623C7F6C38C3B848BFBE06685A219, cn=RAHUL VIJAY KULKARNI
Date: 2025.04.01 19:19:00 +05'30'

**(राहुल कुलकर्णी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.

२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री,गृह (ग्रामीण/नागरी) यांचे सचिव महाराष्ट्र राज्य ,मंत्रालय, मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अपर पोलीस महासंचालक (नि व सं), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महासंचालक, न्यायसहायक वैज्ञानिक संचालनालय, मुंबई
८. विशेष पोलीस महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई
९. सह सचिव (कार्यासन पोल-४), गृह विभाग.
१०. सह/उपसचिव (कार्यासन बीयुडी-१), गृह विभाग.
११. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. निवडनस्ती/गृह विभाग, (विशा-३अ).